**नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या स्थायी सभेने संमत केलेला ठराव क्र. ५९ दि १६.०६.२०१६ विखंडित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नावाशमनपा-२०१६/प्र.क्र.१९३/नवि-२४**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २८ डिसेंबर, २०१६

वाचा : आयुक्त,नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. नावाशमनपा/ साप्रवि/ आस्था १/६०४८/२०१६ दि. ०६.०८.२०१६.

**शासन निर्णय :**

नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेतील श्री प्रकाश जयराम भंडारी, शिपाई यांना कामात निष्काळजीपणा करणे व नेमुन दिलेल्या कर्तव्यात कसुर करणे या दोषारोपांसाठी नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेने त्यांच्या दि. २१.०६.२००६ च्या कार्यालयीन आदेशान्वये निलंबीत केले होते. तद्नंतर तत्कालीन आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी दि. २४.०१.२००७ रोजी महानगरपालिकेतील निलंबीत २९ कर्मचाऱ्यांचा आढावा घेवून, त्यांना शिक्षा देवुन, त्यांच्या पुर्नस्थापनेबाबतचे आदेश दिले. त्यानुसार श्री प्रकाश जयराम भंडारी, शिपाई यांची अनधिकृत अनुपस्थिती कालावधी व निलंबन कालावधी निलंबन काळ गृहीत धरुन, एक वेतनवाढ कायम स्वरुपी गोठवून, कोणतीही विभागीय चौकशी प्रस्तावीत न करता त्यांना अभिलेख विभागात रुजु करुन घेण्यात आले.श्री प्रकाश भंडारी यांनी सभापती, स्थायी समिती, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांच्याकडे दि. ०७.०६.२०१६ रोजी सदर शिक्षेविरुध्द अपील दाखल केले.त्यानुसार नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने दि १६.०६.२०१६ रोजी ठराव क्र. ५९ पारीत करुन श्री प्रकाश जयराम भंडारी यांचे अपील मंजुर करुन, त्यांचा निलंबन कालावधी कर्तव्य काळ गृहीत धरुन व कायम स्वरुपी बंद केलेली एक वार्षीक वेतन वाढ चालु करण्यास मान्यता दिली आहे.

२. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम ५६(२),(ब) नुसार आयुक्तांना महानगरपालिकेने नेमलेल्या कोणत्याही अधिकारी/कर्मचाऱ्यांवर किरकोळ शास्ती लावता येते.तसेच महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम ५६(४)पोटकलम १ परंतूक खंड (ड) च्या तरतुदीनुसार सदर शास्ती किरकोळ स्वरुपाची असल्याने ती रद्द करता येत नाही अथवा त्यात बदलही करता येत नाहीत.

३. यास्तव नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने दि. १६.०६.२०१६ रोजी पारीत केलेला ठराव क्र.५९ हा प्रशासकीय टिप्पणीच्या विरुध्द तसेच नियमबाहय असल्याने विखंडीत करण्यासाठी महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम मधील कलम ४५१(१) नुसार प्रथमत: १ महिन्याच्या कालावधीसाठी निलंबीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१६१२२८१५१६४७७३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhaker
Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2016.12.28 15:23:10 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका.
३) नगर सचिव, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका.
४) मा.सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) उप सचिव (नवि-२४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) निवड नस्ती (नवि-२४) (२ प्रती).